राज्य योजना सन २०१५-१६ निसर्ग पर्यटन योजने अंतर्गत चालू बाब प्रस्ताव.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०६१५/प्र.क्र.१७०/भाग-२/फ-१**
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक :- २१ ऑक्टोबर, २०१५.

वाचा :-

१) वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं - २०१५ / प्र. क्र. ८५ / अर्थ - ३, दिनांक :- १७.०४.२०१५.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-१/पी./यो/चाबाप्र/प्र.क्र.४१/(भाग-२)/१५-१६/१०९९, दिनांक १०.०९.२०१५.
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचकडील पत्र क्र. कक्ष-२२(६)/योजना/प्र.क्र.८४/२४८२/१५-१६, दिनांक २१.०९.२०१५.
४) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचकडील पत्र क्र. कक्ष-२२(६)/योजना/प्र.क्र.८४/२८०१/१५-१६, दिनांक १३.१०.२०१५.

**प्रस्तावना :-**

सन २०१५-१६ राज्यस्तरीय योजनेअंतर्गत निसर्ग पर्यटन योजना (२४०६ २२९५) या लेखाशिर्षांतर्गत रुपये ५१००.०० लक्ष इतका नियतव्यय अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. सदर योजनेतील रु. २०००.०० लक्ष इतका नियतव्यय संरक्षित क्षेत्राकरिता मंजूर करण्यात आला आहे.

सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात आतापर्यत निसर्ग पर्यटन योजना (२४०६ २२९५) या योजनेअंतर्गत विविध शासन निर्णयान्वये रु.२४०.१२ लक्ष निधी वितरीत करण्यात आला आहे.

शासन निर्णय बैठक- २०११/ प्र.क्र. १७४/ फ-५ दि. २४.१०.२०११ अन्वये गठीत निसर्ग पर्यटन तज्ञ समितीने संदर्भ क्र. ३ व ४ नुसार संरक्षित क्षेत्राच्या आराखडयांना मंजूरी प्रदान केलेल्या आराखड्यापैकी तांत्रिक / प्रशासकीय मान्या प्राप्त असलेल्या कार्यबाबींना मंजूरी देणे प्रस्तावित आहे.

वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक १ च्या परिपत्रकानुसार सन २०१५-१६ करीता योजनेअंतर्गत निसर्ग पर्यटन योजना (२४०६ २२९५) मधील विहीत प्रयोजनाखाली अर्थसंकल्पित निधीच्या ७० % मर्यादेत निधी माहे नोव्हेंबर, २०१५ पर्यत खर्च करण्यास **“ अर्थसंकल्पात समाविष्ट असलेल्या योजनांतर्गत जुन्या योजनांचा खर्च - योजनेच्या स्वरुपात अथवा व्याप्तीमध्ये बदल होत नसल्यास वित्त विभागाबरोबर नियोजन विभागाचीही सहमती आवश्यक नाही "** या अटीवर खर्च करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

**शासन निर्णय :-**

संदर्भ क्रमांक २ च्या पत्रान्वये अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सादर केलेल्या प्रस्तावापैकी सोबतच्या परिशिष्टात नमूद केलेल्या प्रशासकीय / तांत्रिक मान्यता प्राप्त व संदर्भ क्रमांक २ च्या निसर्ग पर्यटन तज्ञ समितीने पर्यटन

आराखड्यास मंजूरी दिल्याप्रमाणे एकूण **रु. ९४.७९ लक्षच्या** कार्यबाबीकरीता निधी खालील अटींच्या अधीन राहून खर्च करण्यास शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१) सदर योजनेवर खर्ची टाकावयाची रक्कम सन २०१५-१६ मध्ये लेखाशिर्ष क्र.२४०६ वनीकरण व वन्यजीवन, पंचवार्षिक योजनांतर्गत, राज्य योजनांतर्गत योजना (०२) (०६) इको टुरिझम (राज्य) (२४०६-२२९५) अंतर्गत उद्दीष्टनिहाय, अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे प्राप्त होणाऱ्या निधीतून सोबत जोडलेल्या विवरणपत्रानुसार खर्च करण्यात यावी.

२) योजनांतर्गत प्रस्तावित कार्यबाबींना आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांनी प्रशासकीय व तांत्रिक मान्यता प्रदान केलेली आहे, याची खातरजमा झाल्यानंतरच सदर कार्यबाबीवर निधी खर्ची टाकण्यात यावा आणि याची जबाबदारी प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) यांची राहील.

३) कार्यबाबीमध्ये खरेदीचा समावेश असल्यास शासनाने विहित केलेल्या पद्धतीचा अवलंब करुन खरेदी करण्यात यावी.

४) सदर कामे करताना भारतीय वन अधिनियम, १९२७, वन्यजीव (संरक्षण) अधिनियम १९७२ व वन (संवर्धन) अधिनियम १९८० चा भंग होणार नाही या अटीवर मंजूरी देण्यात येत आहे.

५) केंद्र शासन व राज्य शासनाचे निसर्ग पर्यटन धोरणाशी अनुकूल राहतील अशीच कामे कार्यान्वित करावी.

६) प्रस्तावित कार्यबाबींचा समावेश संबंधित संरक्षित क्षेत्रांच्या सर्वंकष पर्यटन आराखड्यात करण्यात यावा.

७) वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे व दिनांक १७.०४.२०१५ च्या परिपत्रकाचे काटेकोर पालन करावे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दिनांक १७.०४.२०१५ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०२११५१११९२११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

APTE ARVIND SHANKAR

Digitally signed by APTE ARVIND SHANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT,CID - 918010, postalCode=400032, st=Maharashtra, cn=APTE ARVIND SHANKAR
Date: 2015.10.21 15:14:14 +05'30'

**(अरविंद आपटे)**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग.

**प्रति :**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पश्चिम, मुंबई.
५. मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, संह्याद्री व्याघ्र प्रकल्प, कोल्हापूर.

**प्रत :**

१. महालेखापाल १ व २ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
२. वित्त विभाग, (व्यय-१०) मंत्रालय, मुंबई- ३२.
३. कक्ष अधिकारी (कार्यासन ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय मुंबई ३२.
४. कक्ष अधिकारी (कार्यासन फ-२), महसूल व वन विभाग, मंत्रालय मुंबई ३२.
५. निवड नस्ती, फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय मुंबई ३२.

********

**शासन निर्णय क्रमांक :- डब्ल्यूएलपी ०६१५/प्र.क्र. १७० /भाग-२/फ-१, दिनांक :- २१ ऑक्टोबर, २०१५ सोबतचे विवरणपत्र.**

**(रक्कम रुपये लाखात)**

| प्रधान शिर्ष | सविस्तर शिर्ष | ऑक्टोबर, २०१५ | नोव्हेंबर, २०१५ | एकूण |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| २४०६ २२९५ | ०२-मजुरी | १८.९४ | १८.९४ | **३७.८८** |
| | २१- पुरवठा व सामग्री | १२.३५ | १२.३६ | **२४.७१** |
| | २७-लहान बांधकामे | ६.६३ | ६.६३ | **१३.२६** |
| | ५०-इतर खर्च | ९.४७ | ९.४७ | **१८.९४** |
| | **एकूण** | **४७.३९** | **४७.४०** | **९४.७९** |

## परिशिष्ट

## अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम, मुंबई यांचेकडील खालीलप्रमाणे एकूण कामे रू. ९४.७९लक्ष

राधानगरी अभयारण्य

| अ.क्र. | योजनेतील प्रस्तावित बाबनिहाय कामे | बाबनिहाय अंदाजित रक्कम (लाखात) |
|---|---|---|
| १ | दाजीपूर येथील विश्रामगृहाची दुरूस्ती करणे | ४.७० |
| २ | ठक्याचा वाडा येथे पर्यटकांसाठी तंबु निवासाची व्यवस्था करणे (प्रिकोटेड कलर पत्र्याचे छत व स्वच्छतागृह) तंबु क्र. ४ | ४.९४ |
| ३ | ठक्याचा वाडा येथे पर्यटकांसाठी तंबु निवासाची व्यवस्था करणे (प्रिकोटेड कलर पत्र्याचे छत व स्वच्छतागृह) तंबु क्र. ५ | ४.९४ |
| ४ | ठक्याचा वाडा येथे पर्यटकांसाठी तंबु निवासाची व्यवस्था करणे (प्रिकोटेड कलर पत्र्याचे छत व स्वच्छतागृह) तंबु क्र. ६ | ४.९४ |
| ५ | तयार ३ तंबु खरेदी करणे व तंबु कुटीसाठी अंतर्गत फर्निचर - कपाट, बेड, सोलर व्यवस्था इ. पुरवठा करणे. | १५.१८ |
| | **एकूण** | **३४.७०** |

सह्याद्री व्याघ्र प्रकल्प

| अ.क्र. | योजनेतील प्रस्तावित बाबनिहाय कामे | बाबनिहाय अंदाजित रक्कम (लाखात) |
|---|---|---|
| १ | मेट इंदवली येथे बोट / लॉचसाठी धक्का बांधणे (Floatting Jetty) | १५.५०६ |
| २ | आरव (कांदाटी खोरे) येथे पर्यटन महोत्सव साजरा करणे- जाहिरात प्रसिध्दी व वाहतूक | २.०० |
| ३ | आरव / ओलवण या ठिकाणी तंबू निवास व्यवस्था करणे (प्टफार्म) क्रमांक -१ | २.६० |
| ४ | आरव / ओलवण या ठिकाणी तंबू निवास व्यवस्था करणे (प्टफार्म) क्रमांक -२ | २.६० |
| ५ | आरव / ओलवण या ठिकाणी तंबू निवास व्यवस्था करणे (प्टफार्म) क्रमांक -३ | २.६० |
| ६ | आरव / ओलवण या ठिकाणी तंबू निवास व्यवस्था करणे (प्टफार्म) क्रमांक -४ | २.६० |
| ७ | आरव / ओलवण या ठिकाणी तंबू निवास व्यवस्था करणे (स्वच्छतागृह) क्रमांक -१ | २.९८६ |
| ८ | आरव / ओलवण या ठिकाणी तंबू निवास व्यवस्था करणे (स्वच्छतागृह) क्रमांक -२ | २.९८६ |

| | | |
|---|---|---|
| ९ | आरव / ओलवण या ठिकाणी तंबू निवास व्यवस्था करणे (स्वच्छतागृह) क्रमांक -३ | २.९८६ |
| १० | आरव / ओलवण या ठिकाणी तंबू निवास व्यवस्था करणे (स्वच्छतागृह) क्रमांक -४ | २.९८६ |
| ११ | आरव / ओलवण या ठिकाणी तयार ४ तंबू खरेदी करणे व तंबू कुटीसाठीअंतर्गत फर्निचर - कपाट, बेड, सोलर व्यवस्था इ. पुरवठा करणे @ रु. ५.०६ लक्ष प्रमाणे | २०.२४० |
| | **एकूण** | **६०.०९** |

*******